**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेतील अधिकारी/कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विप्रप्र २०१९ /प्र.क्र.१०५/१९/१२-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-१६ मार्च, २०२०.

संदर्भ : १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मप्रप्र २००९/४३७/प्रक्र.१४७/०९/१२-अ दि. ४ मे, २०११.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन ०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ दि. २३ सप्टेंबर, २०११.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टिआरएन २०११/प्र.क्र.२८७/११/१२-अ दि. १४ ऑक्टोबर, २०१३.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक यशदा २०१४/४४१/प्रक्र.९३/१४/१२-अ दि. ११ मे, २०१५.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर -२०१९/प्रक्र.१/ सेवा-९ दि.३० जानेवारी, २०१९
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर - २०१९/प्र. क्र. ८ /सेवा-९, दि.२० फेब्रुवारी, २०१९.
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर - २०१९/प्र.क्र.१५/सेवा-९, दि.१४ मे, २०१९.
८. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९,दि.३० मे, २०१९.

**प्रस्तावना :-**

राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ च्या शिफारशी शासनाने स्वीकृत करण्याचा निर्णय संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्या अनुषंगाने राज्य शासकीय कर्मचा-यांना दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून सुधारीत वेतन संरचना लागू करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम, २०१९ अधिसूचित केले आहे. तसेच या नियमांनुसार प्रारंभिक वेतननिश्चितीबाबतची सविस्तर कार्यपध्दती सदर शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली आहे.

२. डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेतील अधिकारी /कर्मचारी यांना राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ च्या शिफारशींच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये ६ पदांना सुधारीत वेतन संरचना लागू करण्यात आली आहे. आता डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेतील अधिकारी /कर्मचारी यांना सुधारित वेतन संरचना लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन आता असे आदेश देत आहे की, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेतील दि.११.५.२०१५ च्या शासन निर्णयातील आकृतिबंधानुसार मंजूर २० पदांना सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने पुढे दर्शविल्याप्रमाणे सुधारित वेतन संरचना मंजूर करण्यात येत आहे.

सुधारित वेतन संरचनेतील वेतननिश्चिती आणि त्यानुषंगाने अनुज्ञेय थकबाकीचे प्रदान संदर्भाधीन क्र.५ येथील शासन अधिसूचना वित्त विभाग दिनांक ३० जानेवारी, २०१९, संदर्भाधीन क्र.६ येथील शासन परिपत्रक वित्त विभाग दि.२० फेब्रुवारी, २०१९, संदर्भाधीन क्र.७ येथील शासन परिपत्रक वित्त विभाग दि.१४ मे, २०१९ आणि संदर्भाधीन क्र.८ येथील शासन परिपत्रक वित्त विभाग दि.३० मे, २०१९ मधील तरतुदींनुसार करण्यात यावे.

| अ क्र | पदाचे नाव | मंजूर पदसंख्या | शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१२-अ,दि. ११.५.२०१५ प्रमाणे विद्यमान वेतनबँड संरचना | | सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर / Pay Level in Revised Pay Matrix (रुपये) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | वेतनबँड ( रूपये ) | ग्रेड वेतन (रूपये ) | | |
| १ | २ | | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | संचालक वर्ग-१ | १ | PB-३ १५६००-३९१०० | ७६०० | S-२५ | ७८८००-२०९२०० |
| २ | निबंधक तथा सहायक प्राध्यापक वर्ग-१ | १ | PB-३ १५६००-३९१०० | ५००० | S-१९ | ५५१००-१७५१०० |
| ३ | सहायक प्राध्यापक वर्ग-१ | ८ | PB-३ १५६००-३९१०० | ५००० | S-१९ | ५५१००-१७५१०० |
| ४ | सहायक लेखाधिकारी वर्ग-३ | १ | PB-२ ९३००-३४८०० | ४४०० | S-१५ | ४१८००-१३२३०० |
| ५ | वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक वर्ग-३ | १ | PB-२ ९३००-३४८०० | ४२०० | S-१३ | ३५४००-११२४०० |
| ६ | कार्यालयीन अधिक्षक/ स्टेनोग्राफर वर्ग-३ | १ | PB-२ ९३००-३४८०० | ४२०० | S-१३ | ३५४००-११२४०० |
| ७ | ग्रंथपाल वर्ग-३ | १ | PB-१ ५२००-२०२०० | २४०० | S-८ | २५५००-८११०० |
| ८ | प्रशासकीय सहायक वर्ग-३ (बाह्यस्त्रोत) | ४ | PB-१ ५२००-२०२०० | १९०० | S-६ | १९९००-६३२०० |
| ९ | शिपाई (बाह्यस्त्रोत) | २ | १ S ४४४०-७४४० | १३०० | S-१ | १५०००-४७६०० |

२. सुधारित वेतन संरचनेत वेतन निश्चिती करण्यासाठी आवश्यक तो विकल्प हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत देण्यात यावा. एकदा दिलेला विकल्प अंतिम राहील.

३. या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशिर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा ००३ प्रशिक्षण (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान (योजनेतर) (२०७० ०७५५) - ३६ सहायक अनुदाने (वेतने)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०/२०२०/ सेवा-९ दि.२८.१.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००३१६११४८२५३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rohini Bhalekar
Date: 2020.03.16 11:52:49 +05'30'

**( रोहिणी भालेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, तथा अध्यक्ष विदर्भ अमरावती.
२. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा,( महाराष्ट्र-१) मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा,( महाराष्ट्र-२) नागपूर,
५. उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७. उप कोषागार कार्यालय, अमरावती.
८. वित्त विभाग / सेवा-९ मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (कार्या १२-अ).